**मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत प्रादेशिक लघु पाटबंधारे कक्ष, नागपूर येथील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि.०१/०३/२०२३ ते दि. ३१/०८/२०२३ पर्यंत मुदतवाढ मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुवाढ-२०२३/( ११४ /२०२३)/लपा**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १७ /०३/२०२३

**<u>पहावे</u> :** १) शासन निर्णय क्रमांक मुवाढ २०२२/(२८१/२०२२)/लपा, दिनांक : २९/०८/२०२२.
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि. ०८.०२.२०२३.
३) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,नागपूर यांचे पत्र जा.क्र.६०१/आस्था-८/मुदतवाढ/२०२३, दि. १६.०२.२०२३.

**<u>प्रस्तावना</u>:-**संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,नागपूर यांच्या अधिपत्याखालील प्रादेशिक लघु पाटबंधारे कक्ष, जलसंपदा विभाग, नागपूर विभागातील नियत अस्थायी आस्थापनेवरील २२ पदांना दि. ०१/०९/२०२२ ते दि. २८/०२/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भ क्र. २ चे वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२३ ते दि. ३१/०८/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय:-** आता संदर्भ क्रमांक ३ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार आणि सोबतच्या परिशिष्ट “अ”, मध्ये दर्शविल्याप्रमाणे मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत प्रादेशिक लघु पाटबंधारे कक्ष, नागपूर या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील २२ पदांना दि.०१/०३/२०२३ ते दि. ३१/०८/२०२३ पर्यंत खालील अटींचे अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे, सदर कर्मचारी कार्यरत असेपर्यंत चालु राहतील.
२) उपरोक्त पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
३) मुदतवाढ मंजुरी द्यावयाची नियत अस्थायी पदे विहित आकृतीबंधातील असावीत व ही पदे सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त/व्यपगत झालेली नसतील.
४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,नागपूर यांच्या कार्यालयाने उपलब्ध करुन दिलेल्या प्रस्तावामधील पदांची संख्या/पदांमधील घट/पदांमधील वाढ/सेवानिवृत्ती इ. माहिती अंतिम/अचूक आहे असे गृहित धरुन त्यांचे मागणीनुसार पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.
५) या सर्व पदांचा पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव विहित प्रपत्रात प्रमाणपत्रासह विनाविलंब सादर करण्यात यावा.

नियत अस्थायी आस्थापनेच्या पदांचा वेतनाचा खर्च हा पुढील नमुद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

"मागणी क्र.आय-५ ,४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यांवरील भांडवली खर्च (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (वेतन) (०४)(०२)) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (अनिवार्य) (४७०१ आय १७१)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हा निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०८.०२.२०२३ अन्वये प्रशासकिय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३१७१८४४१३२२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

REKHA AJIT BHAWAR

Digitally signed by REKHA AJIT BHAWAR
DN: CN = REKHA AJIT BHAWAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.17 18:49:23 +05'30'

**( रेखा भवार )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट अ**

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
२. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
३. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर,
४. कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, नागपूर,
५. कक्ष अधिकारी, आ(प्रशि) कार्यासन, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. निवड नस्ती (मुदतवाढ)/लपा कार्यासन संग्रहार्थ.

## परिशिष्ट - अ

शासन निर्णय क्र.मुवाढ २०२३/( ११४ /२३)/लपा,दि.१७/०३/२०२३ चे सहपत्र

नियत अस्थायी आस्थापना पदांचा तपशिल

सेवा सातत्य कालावधी दि.०१/३/२०२३ ते दि.३१/०८/२०२३

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत प्रादेशिक लघु पाटबंधारे कक्ष, नागपूर

| अ.क्र. | पदनाम | मंजूर पदे |
|---|---|---|
| | **(अ) तांत्रिक पदे** | |
| १ | कार्यकारी अभियंता | १ |
| २ | उप अभियंता | ४ |
| ३ | क. अ./स. अ.-२/शा. अ. | ४ |
| ४ | अनुरेखक | १ |
| | **अ - एकूण पदे** | **१०** |
| | **(ब) अतांत्रिक पदे** | |
| १ | प्रथम लिपिक | १ |
| २ | वरिष्ठ लिपिक | ३ |
| ३ | कनिष्ठ लिपिक | १ |
| ४ | लघु टंकलेखक | २ |
| ५ | शिपाई | ४ |
| ६ | वाहन चालक | १ |
| | **ब - एकूण पदे** | **१२** |
| | **एकूण पदे २२ (अ + ब)** | **२२** |

REKHA AJIT BHAWAR

Digitally signed by REKHA AJIT BHAWAR
DN: CN = REKHA AJIT BHAWAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.17 18:49:39 +05'30'

( रेखा भवार )

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन